हंगाम २०१६-१७ खरेदी केलेल्या
धानाच्या भरडाईबाबत.

# महाराष्ट्र शासन

## अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

## शासन शुध्दीपत्रक, क्रमांकः धानभ - १०१६/प्र.क्र.२१० / ना.पु.२९

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, (विस्तार) मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ५ जानेवारी, २०१७

वाचा -

**शासन परिपत्रक ,समक्रमांकः दि. १६.१२.२०१६**

## शुध्दीपत्रक-

संदर्भाधिन परिपत्रकासोबतचे जोडपत्र-५ रदद करण्यात येत असून त्याऐवजी सुधारित जोडपत्र -५ सोबत जोडले आहे.

तसेच वरील परिपत्रकातील अ.क्र. ३७ च्या पुढे हंगाम २०१६-१७ मध्ये खरेदी केलेल्या धानाच्या भरडाई संदर्भात आणखी नवीन सूचनांचा पुढीलप्रमाणे समावेश करण्यात येत आहे.

सीएमआर वाहतूक :-

१) त्या जिल्हयास आवश्यक असलेल्या अधिकच्या (CMR) नियतनाची वाहतूक सार्वजनिक वितरण व्यवस्थेमधील वाहतूक ठेकेदाराकडून थेट भरडाई केंद्रापासून शासकीय गोदामापर्यंत करण्यात यावी.

२) अशी वाहतूक शासकीय गोदामापर्यंत जवळच्या भरडाई केंद्रावरुन करण्यात यावी.

३) अशा वाहतूकीसाठी Q.C. भरडाई केंद्रावरच करण्यात यावी.

४) भरडाई केंद्रावर FCI च्या निदेशानुसार २७ मे.टन चा लॉट बनविण्यात यावा.

५) Q.C. झाल्यानंतर लॉटची उचल एकदाच करण्यात यावी. त्याकरीता १७ मे. टन व १० मे. टन अशा दोन गाडया किंवा ९ मे. टनाच्या ३ गाडया वापरण्यात याव्यात.

६) त्या त्या जिल्हयामध्ये उपलब्ध होणारा सीएमआर वजा त्या जिल्हयाचे एकूण १० महिन्याचे नियतनानंतर जो सीएमआर शिल्लक राहील तो सीएमआर भाडयाने घेतलेल्या गोदामामध्ये (बेस डेपो) साठविण्यात यावा.

७) असा अतिरिक्त सीएमआर कोणत्या जिल्हयासाठी उपलब्ध करुन देण्यात येईल हे लेखी स्वरुपात त्या त्या जिल्हयाला अवगत करावे.

८) भरडाई केंद्रावरुन बेस डेपो पर्यंतची वाहतूक ही मिलरमार्फत करण्यात येईल. त्याची Q.C. बेस डेपो स्तरावर होईल.

९) बेस डेपोपासून शासकीय गोदामापर्यंतची वाहतूक ही शासकीय वाहतूक ठेकेदारामार्फत जाईल.

**देयक प्रदानाबाबत :-**

१०) पहिल्या टप्प्याकरिता जेवढे अंतर मान्य आहे, त्या देयकाचे प्रदान NFSA मधील उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून करण्यात यावे. त्यापुढील अंतराच्या देयकाचे प्रदान MSP मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या स्वीय प्रपंजी लेख्या मधून ( PLA ) करता येईल . याबाबतची तशी देयके या कार्यालयास सादर करण्यात यावी.

११) हे अतिरिक्त अंतर परिगणित करताना पुढील पध्दत वापरण्यात यावी.

i) MSP बेस डेपोपासून शासकीय गोदामापर्यंत केलेल्या वाहतूकींचे अंतर वजा शासकीय गोदाम ते सदर गोदामाचा FCI बेस डेपो.

उदा. अ) शासकीय गोदाम ते MSP गोदाम १०० किमी

ब) शासकीय गोदाम ते FCI बेस डेपो ४० किमी

अतिरिक्त वाहतूक = अ)-ब) =६० किमी

ii) १०० किमी ची सलग वाहतूक असल्यामुळे त्याची परिगणना सलग करण्यात यावी. पहिल्या ४०किमी.साठी एक देयक व पुढील ६० किमी. साठी वेगळे देयके तयार करावे.

१२) अशा गोदामाच्या भाडयाच्या देयकाचे प्रदान हे MSP मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून वित्तीय सल्लागार व उपसचिव, (अनापुवग्रासं) ,मुंबई यांचे कार्यालयाच्या स्तरावरुन करण्यात येईल.

१३) संबंधित जिल्हयाचे नियतन MSP मधून देण्यापूर्वी त्यांसाठी जेवढी रक्कम FCI ला भरावी लागली असती तेवढी रक्कम वित्तीय सल्लागार व उपसचिव, (अनापुवग्रासं) ,मुंबई यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यात ( PLA ) जमा करण्यात यावी व त्यांचे कार्यालयाच्या संमतीपत्रानंतरच सीएमआर पीडीएस मध्ये वितरित करण्यात यावा.

**सर्वसाधारण सूचना -**

१४) तांदूळ पीडीएस मध्ये वितरित केल्यानंतर दरमहा प्रमाणपत्रे पुढील प्रमाणे DSO कार्यालयाने वित्तीय सल्लागार व उपसचिव, (अनापुवग्रासं) ,मुंबई यांचे कार्यालयास सादर करावीत. ( नमूना जोडपत्र -६ मध्ये पहावा.)

१५) MSP सीमएआर जमा करण्यासाठी भाडयाने घेतलेल्या गोदामामध्ये एकदा साठा केलेला सीएमआर ३ महिन्यापेक्षा अधिक तर शासकीय गोदामामध्ये दोन महिन्यांपेक्षा अधिक काळ राहणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

१६) CMR चे साठवणूक व वितरणाची कार्यवाही तयार करण्यात आलेल्या Plan प्रमाणे करण्यात यावी. त्यामध्ये जवळचे भरडाई केंद्र व जवळचा जिल्हा याप्रमाणे प्राधान्य देत जावे. वाहतूक खर्च कमीत कमी ठेवण्यासाठी व कार्यक्षम वितरणासाठी हया बाबी आवश्यक आहेत.

१७) बॅक गॅरंटी ऐवजी FDR/TDR घेता येईल. तो बँक गॅरंटीच्या मुल्याएवढाचा असला पाहिजे. तसेच अभिकर्त्यांच्या नावे व पुरेशा कालावधीचा आणि अभिकर्त्यांच्या ताब्यामध्ये असावा.

१८) तांदूळाचे प्रत्यक्ष PDS मधील वितरण व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय केंद्र शासनाकडून MSP अंतर्गत झालेल्या खर्चाची प्रतिपूर्ती होणार नाही. यास्तव धानाची भरडाई व सीएमआरचे PDS मधील वाटप शक्य तेवढया कमी कालावधीत होणे आवश्यक आहे.

१९) बेस गोडाऊन येथील Q.C ची जबाबदारी व इतर जिल्हयांना तांदूळ वितरणाची जबाबदारी त्या त्या जिल्हयाची राहील.

२०) NFSA अंतर्गत अन्न धान्य न मिळणा-या १४ जिल्हयातील आत्महत्याग्रस्त शेतकरी लाभार्थ्यांसाठी MSP अंतर्गतच्या CMR चा वापर करण्यात येऊ नये.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०५१२५५११९८०६ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2017.01.05 13:27:04 +05'30'

( सतिश सुपे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**सोबत** :- सुधारित जोडपत्र-५ व
जोडपत्र-६

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
४) मा. मंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव,
५) मा. मंत्री, पणन यांचे खाजगी सचिव,
६) मा. मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव,
७) मा. राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, यांचे खाजगी सचिव,
८) मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
९) मा. विरोधी पक्षनेता( विधानसभा/ विधानपरिषद )
१०) सर्व मा. विधानसभा सदस्य/ मा. विधानपरिषद सदस्य
११) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
१२) अपर मुख्य सचिव, (वित्त) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१३) अपर मुख्य सचिव ( पणन ) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई,
१४) प्रधान सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
१५) प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१६) प्रधान सचिव, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई,
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि.,

१९) कनमूर हाऊस,नरसी नाथा स्ट्रीट,मुंबई- ४०० ००९,
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ,
२१) आदिवासी विकास भवन, २ रा माळा, राम गणेश गडकरी चौक, जुना आग्रा रोड,नाशिक-२,
२२) सर्व विभागीय आयुक्त.
२३) नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा (गो/वा),मुंबई,
२४) सर्व जिल्हाधिकारी,
२५) सर्व उप आयुक्त (पुरवठा),
२६) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
२७) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
२८) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
२९) उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
३०) सर्व उप सचिव/अवर सचिव/सर्व अधिकारी,अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई,
३१) सर व्यवस्थापक,(महा.) भारतीय अन्न महामंडळ, ५ वा माळा, राजेंद्र नगर, दत्तपाडा रोड, बोरीवली पूर्व मुंबई-४०० ०६६,
३२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ),
३३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,ग्रंथालय ६ वा मजला,विधान भवन,मुंबई. (१०प्रती)
३४) मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, ( प्रत्येकी ५ प्रती ),
३५) निवड नस्ती (नापु-२९).

************

सुधारित जोडपत्र - ५

महाराष्ट्र शासन

क्र. धानभ १०१६/प्र.क्र.१२०/नापु-२९/शिकाना
अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
बरॅक क्र. ८, हैद्राबाद हाउस नागपूर
दिनांक: २७ डिसेंबर, २०१६

प्रति

१. महाव्यवस्थापक, मार्केटिंग फेडरेशन लि.
२. महाव्यवस्थापक, आदिवासी विकास महामंडळ
३. उप आयुक्त पुरवठा, नागपूर व कोकण

विषय : - सन २०१६-२०१७ मध्ये खरेदी केलेल्या व भरडाई अंती प्राप्त तांदुळाबाबत करावयाच्या कार्यवाही बाबत.....

संदर्भ :- १) शासन परिपत्रक क्र. धानभ-१०१६/प्र.क्र.२०५/नापु-२९, दिनांक १९.१०.२०१६
२) शासन परिपत्रक क्र. धानभ-१०१६/प्र.क्र.१२०/नापु-२९, दिनांक ०४.११.२०१६
३) क्र. धानभ १०१६/प्र.क्र.०३/नापु-२९/शिकाना, दिनांक ०७.१२.२०१६

उपरोक्त विषयास अनुसरुन आपणास असे कळविण्यात येते की, हंगाम २०१६-१७ मध्ये खरेदी केलेल्या धानाच्या भरडाई बाबतचे आदेश संदर्भांकित क्र.१ व २ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. त्यानुसार गुणवत्ता नियंत्रणाबाबत जिल्हास्तरावर वेळोवेळी प्रशिक्षण देण्यात आलेले आहे. तसेच, उप आयुक्त (पुरवठा) यांनी संदर्भांकित १ व २ च्या परिपत्रकान्वये आदेशित केल्यानुसार त्या जिल्ह्याच्या तांदळाचे गुणवत्ता नियंत्रण (Quality Control) करुन तो तांदुळ संबंधित गिरणीमालकामार्फत शासकीय गोदामात तांदुळ जमा करावयाचा आहे.

२. राज्यात **"विकेंद्रित धान खरेदी योजना"** अंतर्गत जिल्हानिहाय भरडाई करण्यात आलेल्या तांदळासाठी खरीप पणन हंगाम सन २०१६-१७ साठी गोणीवर निळ्या रंगाच्या पट्यांचा (Stencil or Branding as per intenders requirements shall be in "blue" colour) वापर करण्याबाबत शासन क्र. खरेदी-१०१६/४९२/प्र.क्र.११९/नापु-२९, दि. ३० मे, २०१६ च्या पत्रान्वये निर्देशित करण्यात आले असून, त्यावर खाली नमूद केल्याप्रमाणे मजकूर छापण्यात यावा.

| महाराष्ट्र शासन विकेंद्रित खरेदी योजना (२०१६-१७) | |
| --- | --- |
| महाराष्ट्र राज्य को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि. / मर्या. | महाराष्ट्र राज्य आदिवासी विकास महामंडळ |
| जिल्हा मार्केटिंग अधिकारी- | जिल्हा व्यवस्थापक- |
| जिल्हा- | जिल्हा |

३. भरडाई अंती प्राप्त तांदुळाबाबत संदर्भांकित क्र.३ च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या इतिवृत्तास अनुसरुन "तांदुळ विश्लेषण अहवाल" व "तांदुळ स्वीकृती पावती" यांचा विहीत नमुना तयार करण्यात आला असून, तो या पत्रासोबत जोडण्यात येत आहे. त्याप्रमाणे भरडाईची कार्यवाही करावी.

सोबत : वरीलप्रमाणे




(प्रविण नलावडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत उचित कार्यवाहीसाठी रवाना

१. जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर, भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर, वर्धा, यवतमाळ, अमरावती, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, रायगड, ठाणे व पालघर
२. जिल्हा मार्केटिंग अधिकारी, नागपूर, भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर, वर्धा, यवतमाळ, अमरावती, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, रायगड, ठाणे व पालघर

# तांदुळ विश्लेषण अहवाल

( ANALYSIS REPORT OF RICE )

दिनांक:- / /

## भाग 'अ'

| मानके (REFRACTION) | टक्केवारी (PERCENTAGE) |
|---|---|
| १. तुटलेले दाणे (Brokens) | |
| अ) १/८ ते १/४ पर्यंत (Over 1/8 the to below 1/8 th) | |
| ब) १/४ ते ३/४ पर्यंत | |
| २.अन्य घटक (Foreign Matters) | |
| अ) सेंद्रिय (Organic) | |
| ब) असेंद्रीस ( Inorganic) | |
| ३.क्षतिग्रस्त दाणे (Damaged Grains) | |
| ४.रंगहिन दाणे (Discoloured Grains) | |
| ५.पांढुरके दाणे (Chalky Grains) | |
| ६.लाल दाणे (Red Grains) | |
| ७.कमी दर्जाचे मिश्रीत दाणे (Admixture of lower Classes) | |
| ८.छिलका असलेले दाणे (Hailky Grains) | |
| ९.ओलावा (Moisture Content) | |

## भाग 'ब'

| |
|---|
| १.भात गिरणीचे नाव व पत्ता:- .................................... |
| २.गुणवत्ता तपासणी केलेल्या तांदुळाचे एकुण पोते व वजन :- .................................... |
| ३. स्विकृती पावती क्रमांक व दिनांक:- .................................... |

( स्वाक्षरी )

गुणवत्ता नियंत्रक तथा

प्राधिकृत उचल/ वाहतुक प्रतिनिधी

जिल्हा ..................

क्रमांक:- . . . . . .

# तांदुळ स्विकृती पावती

**संदर्भ:-**१) शासन निर्णय क्रमांक खरेदी-१०१६/प्र.क्र.२०१५/ना.पु.२९, दिनांक- १९ ऑक्टोबर,२०१६.

२) शासन निर्णय क्रमांक धानभ-१०१६/प्र.क्र.२०१०/ना.पु.२९, दिनांक- ०४ नोव्हेंबर,२०१६.

दिनांक:- / /

A) **हंगाम** :-

B) **यंत्रणेचे नाव** :-

C) **जिल्हा** :-

D) **भात गिरणीचे नाव व पत्ता** :-

| अ.क्र. | तारीख | ट्रक क्रमांक | गुणवत्ता तपासणी दिनांक | ज्या गोदामात तांदुळ पाठविण्यात आला त्या गोदामाचे नाव | तांदळाची प्रत | एकुण बारदाना संख्या | तांदळाचे निव्वळ वजन क्विंटल | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |

प्रमाणित करण्यात येते की, वर दर्शविलेली बारदाना संख्या-------------एवढी असुन प्रती बारदाना वजन ६१५ ग्रॅम प्रमाणे एकुण बारदान्याचे होणारे वजन-------------- कमी करून तांदळाचे निव्वळ वजन दर्शविले आहे.

**गिरणी मालकाचे नाव**
**व सही**

**डी.एम.ओ./प्रादेशिक व्यवस्थापक,**
**मार्केटिंग फेड./म.रा.सह.आदि.विकास महा.**
**यांचे प्रतिनिधी**

**जिल्हा पुरवठा अधिकारी. . . .**
**यांचे प्राधिकृत प्रतिनिधीचे**
**नाव व सही**

६१५

# जोडपत्र-६

## प्रमाणपत्र

याद्वारे प्रमाणित करण्यात येते की,

१. आधारभूत किंमत योजनेंतर्गत खरेदी करण्यात आलेल्या धानाची भरडाई करुन प्राप्त CMR पैकी माहे -------------------- ,२०१६ मध्ये ---------------------- मे.टन CMR वितरित करण्यात आला आहे.
२. उपरोक्त नमूद केलेला सीएमआर हो गुण्वत्ता तपासणर करुन घेण्यात आला असून एफ ए क्यु दर्जाचा आहे.
३. सदर CMR महाराष्ट्र शासन व अन्न व सार्वजनिक वितरण विभाग, भारत सरकार मधील सामंजस्य करारानुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजना, अंत्योदय योजना, इतर कल्याणकारी योजनेच्या लाभार्थ्यांनाच वितरित करण्यात आला आहे.
४. तसेच, उपरोक्त नमूद परिमाण हे पूर्णत : DCP अंतर्गत प्राप्त CMR चे असून यात भारतीय अन्न महामंडळाकडून उचल केलेल्या तांदूळाचा समसावेश नाही.
५. सदर तांदूळ हा बंदिस्त गोदामात साठवणूक करण्यात आलेला होता.

**जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी**